कारागृह विभागातील उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह/अधीक्षक, जिल्हा कारागृह वर्ग-२ या संवर्गातील अधिकारी यांची सार्वत्रिक बदली, सन-२०२३.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्र. जेएलई-०३२३/प्र.क्र.६०/तुरूंग-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ जून २०२३.

संदर्भ :-

१. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, १२ मे, २००६.
२. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव दि.१८.०४.२०२३.

**शासन आदेश :-**

गृह विभागाच्या अधिनस्त कारागृह विभागातील उप अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह/अधीक्षक, जिल्हा कारागृह वर्ग-२ या संवर्गातील अधिकारी यांच्या बदल्यांबाबत दि.१८.०५.२०२३ रोजी पार पडलेल्या नागरी सेवा मंडळाच्या शिफारशींच्या अनुषंगाने प्राप्त झालेली शासन मान्यता विचारात घेऊन, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, १२ मे, २००६ च्या नियम ४(१), (२) व (३) आणि नियम ६ मधील तरतुदींनुसार खालील तक्त्यातील अधिकारी यांच्या स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे प्रशासकीय कारणास्तव बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याच्या पदस्थापनेचे ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री. दिलीपसिंग तेजसिंग डाबेराव. | मुंबई मध्यवर्ती कारागृह. | ठाणे मध्यवर्ती कारागृह. |
| २ | श्री. भाईदास नामदेव ढोले. | ठाणे मध्यवर्ती कारागृह. | येरवडा मध्यवर्ती कारागृह. |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून, उक्त अधिकारी यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता संबंधित कार्यालय प्रमुखांनी कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह यांनी बदलीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व रुजू झाल्याचा अहवाल न चुकता शासनास सादर करावा.

३. सदर बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्याविरूध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संकेतांक २०२३०६१४१७२०५२१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK SADASHIV CHAVAN

Digitally signed by VINAYAK SADASHIV CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=3d6fb52eeb39bf3c4a0001ceaa97736aa6fb733903d657c4d7b6e66cdadfd6fd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1DB7A03BD2B7B1CF5AFDC7A4A26DC14D44297AA2B63F7493C19351A3D51630D0, cn=VINAYAK SADASHIV CHAVAN
Date: 2023.06.14 17:23:44 +05'30'

**( विनायक स. चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. विशेष पोलीस महानिरीक्षक (मुख्यालय), अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालय, पुणे.
६. कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई/मध्य विभाग, औरंगाबाद/पूर्व विभाग, नागपूर/पश्चिम विभाग, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी (संबंधित).
८. संबंधित अधिकारी (मार्फत अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे).
९. निवडनस्ती/तुरूंग-१.